महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील
अधिका-यांच्या बदल्या/नियुक्त्या.

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास व जलसंधारण विभाग

**शासन आदेश, क्रमांक : मविसे १० /२०१० /प्र.क्र.१०९/आस्था-३**
**मंत्रालय,मुंबई-४०० ०३२**
**दिनांक:- १७ जून, २०१०**

**आदेश :-** सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम,२००५ मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिका-यांच्या मान्यतेने आणि पदावधी पूर्ण होण्यापूर्वी बदली प्रस्तावित असलेल्या अधिका-यांच्या बाबतीत कलम ४ (४) व (५) मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिका-याच्या पूर्वमान्यतेने ग्राम विकास व जलसंधारण विभागातील खालील अधिका-यांच्या बदल्यांचे आदेश शासन देत आहे. बदलीनंतर संबंधित अधिका-यांची नियुक्ती त्यांच्या नांवासमोरील स्तंभ क्रमांक ४ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| अ.क्र | अधिका-याचे नांव | सध्याचे पद व कार्यालय | बदलीनंतर नियुक्तीचे पद व कार्यालय | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री.एस.डी.जोशी | उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रामपंचायत) जिल्हा परिषद सांगली | गट विकास अधिकारी पंचायत समिती, कडेगाव जि.सांगली | श्री.एस.एम.जंगम यांच्या जागी |
| २ | श्री.एस.एम.जंगम | गट विकास अधिकारी पंचायत समिती, कडेगाव जि.सांगली | उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रामपंचायत) जिल्हा परिषद सांगली | श्री.एस.डी.जोशी यांच्या जागी |
| ३ | श्री.बी.एम.वासुदेव | गट विकास अधिकारी पंचायत समिती दक्षिण सोलापूर जि.सोलापूर | उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रामपंचायत) जिल्हा परिषद रत्नागिरी | श्री.जी.व्ही.चव्हाण यांच्या जागी |
| ४ | श्री.एम.व्ही.चौगुले | उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रामपंचायत) जिल्हा परिषद कोल्हापूर | गट विकास अधिकारी पंचायत समिती, हातकणंगले जि.कोल्हापूर | श्री.नितिन माने यांच्या जागी |
| ५ | श्री.नितिन माने | गट विकास अधिकारी पंचायत समिती, हातकणंगले जि.कोल्हापूर | उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रामपंचायत) जिल्हा परिषद कोल्हापूर | श्री.एम.व्ही.चौगुले यांच्या जागी |
| ६ | श्री.आर.बी.गायकवाड | गट विकास अधिकारी पंचायत समिती, अक्कलकोट जि.सोलापूर | गट विकास अधिकारी पंचायत समिती, तुळजापूर जि.उस्मानाबाद | रिक्त पदी |

| अ.क्र | अधिका-याचे नांव | सध्याचे पद व कार्यालय | बदलीनंतर नियुक्तीचे पद व कार्यालय | शेरा |
|---|---|---|---|---|
| ७ | श्री.के.डी.बोने | गट प्रमुख जलस्वराज्य प्रकल्प, सोलापूर जि.सोलापूर | उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रामपंचायत) जि. प. उस्मानाबाद | श्री.व्ही.ए.बोठे यांच्या जागी |

२. संबंधित अधिका-यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक : सीडीआर १०८२ / २५६७ / २८ / अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

३. संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी बदली झालेल्या अधिका-याला त्यांच्या सध्याच्या पदभारातून पदमुक्त करावे व त्यांना नवीन नेमणूकीच्या जागी तात्काळ रुजू होण्यास सांगावे.

४. संबंधित अधिका-यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास कळवावा.

५. सदर आदेशातील अनुक्रमांक १ आणि ५ येथील अधिका-यांच्या बदल्या हया त्यांच्या विनंतीने होत असल्याने, त्यांना पदग्रहण अवधी तसेच प्रवासभत्ता अनुज्ञेय असणार नाही.

६. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यांत आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००६१७२१०३३६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(सरिता बांदेकर-देशमुख)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,मुंबई -३२
विभागीय आयुक्त, (सर्व)
मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद, (सर्व)
महालेखापाल- १/२ ( लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, मुंबई /नागपूर
**संबंधित अधिकारी द्वारा मु.का.अ.जि.प यांचे मार्फत**
मा.मंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
मा.सचिव ( ग्राम विकास व पंचायत राज ) यांचे स्वीय सहायक.
कार्यासन क्रमांक : आस्था - २ ग्राम विकास व जलसंधारण विभाग
निवड नस्ती ( कार्यासन क्रमांक :आस्था-३ ) ग्राम विकास व जलसंधारण विभाग.